**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागांतर्गत क्षेत्रिय पुरवठा यंत्रणेतील निरीक्षण अधिकारी (पुरवठा), गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या विनंती बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली-२३२३/प्र.क्र.१२७/ ना.पु.१५.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ एप्रिल, २०२३.

वाचा:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व कलम ४ (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने क्षेत्रीय पुरवठा यंत्रणेतील खालील निरीक्षण अधिकारी (पुरवठा), गट-ब (राजपत्रित) यांची विनंती बदली त्यांच्या नावासमोरील दर्शवलेल्या स्तंभ क्र.४ मधील कार्यालयातील निरीक्षण अधिकारी (पुरवठा) पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकारी यांचे नाव | सध्या पदावर कार्यरत असलेले कार्यालय | बदलीनंतर पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती शामली हेतराम धपाडे | ता. पालघर, जि. पालघर,<br>कोकण विभाग | ता.आमगाव, जि. गोंदिया, नागपूर विभाग (रिक्त पदी) |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. श्रीमती शामली हेतराम धपाडे, निरीक्षण अधिकारी (पुरवठा) यांना दि.२४ एप्रिल, २०२३ रोजी (म.नं.) एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. त्यांनी दि.२५ एप्रिल २०२३ रोजी (म.पू.) बदलीच्या पदावर रूजू व्हावे. तसेच, उप आयुक्त (पुरवठा), नागपूर विभाग यांनी श्रीमती शामली हेतराम धपाडे यांना त्यांच्या बदलीच्या पदावर रुजू करून घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. श्रीमती शामली हेतराम धपाडे यांना पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये व महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने श्रीमती शामली हेतराम धपाडे यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोचदेय डाकेने परत करावेत.

४. श्रीमती शामली हेतराम धपाडे यांची बदली त्यांच्या विनंतीवरून करण्यात येत असल्याने त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार नवीन पदस्थापनेच्या पदावर रुजू होण्यासाठी पदग्रहण अवधी, प्रवासभत्ता तसेच इतर अनुषंगिक भत्ते व लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२४२१०६१६२००६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2023.04.24 21:11:43 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्रीमती शामली हेतराम धपाडे, निरीक्षण अधिकारी (पुरवठा) यांना (उपायुक्त (पुरवठा), कोकण विभाग यांच्यामार्फत)

**प्रत :-**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग/नागपूर विभाग.
२) जिल्हाधिकारी, पालघर/गोंदिया.
३) उप आयुक्त (पुरवठा), कोकण विभाग/नागपूर विभाग.
४) मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
५) सचिव (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल , महाराष्ट्र-१ व २ ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) जिल्हा पुरवठा अधिकारी, पालघर/गोंदिया.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/गोंदिया.
१२) निवड नस्ती, कार्यासन नापु- १५.